**जुहू पोलीस ठाणे, मुंबई येथे गु.र.क्र. १०८/२०१९ या गुन्हे प्रकरणातून उद्भवलेले विशेष पोक्सो प्र. क्र. २५०/२०१९ मा. सत्र न्यायालय, दिंडोशी, मुंबई येथे विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून शासनाची बाजू प्रभावीपणे मांडण्याकरीता नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. वैभव बगाडे यांना व्यावसायिक फी प्रदान करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**गृह विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक:- एसपीपी-०३२०/प्र.क्र.५१/पोल-१०,**

गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादम कामा मार्ग,
मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०४ नोव्हेंबर, २०२०

<u>संदर्भ</u> :- शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्र.एसपीपी-२०२०/यू.ओ.आर.२७/डी-१४, दिनांक २१.०९.२०२०

<u>प्रस्तावना:-</u>

जुहू पोलीस ठाणे, मुंबई येथे गु.र.क्र. १०८/२०१९ या गुन्हे प्रकरणातून उद्भवलेले विशेष पोक्सो प्र. क्र. २५०/२०१९ मा. सत्र न्यायालय, दिंडोशी, मुंबई येथे विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून शासनाची बाजू प्रभावीपणे मांडण्याकरीता संदर्भाधीन अधिसूचने अन्वये नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. वैभव बगाडे यांना व्यावसायिक फी अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

जुहू पोलीस ठाणे, मुंबई येथे गु.र.क्र. १०८/२०१९ या गुन्हे प्रकरणातून उद्भवलेले मा. सत्र न्यायालय, दिंडोशी, मुंबई येथील विशेष पोक्सो प्र. क्र. २५०/२०१९ हे न्याय प्रकरण निकाली निघेपर्यंत, विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. वैभव बगाडे यांना प्रतिदिन परिणामकारक सुनावणीकरीता खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**मा. सत्र न्यायालय, दिंडोशी, मुंबई**

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रु.१५,०००/- (रुपये पंधरा हजार फक्त)
ब) विचारविनिमय फी (प्रति बैठक) - रु.२,०००/- (रुपये दोन हजार फक्त)

सदर व्यावसायिक फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड. श्री. वैभव बगाडे यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता व्यावसायिक फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. ॲड. श्री. वैभव बगाडे यांना अनुज्ञेय असलेल्या व्यावसायिक फीचे प्रदान दर दोन महिन्याच्या न्यायालयीन कामकाजानंतर करण्यात यावे. मा. न्यायालयीन कामकाजाचे परिणाम-कारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकांकडून तपासून, प्रमाणित करुन

घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान ॲड. श्री. वैभव बगाडे यांना होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलिस उपायुक्त यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) (१०८), राज्य पोलीस मुख्यालय (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक व विशेष सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र. ४०५/२०/व्यय-७, दि. १९.१०.२०२० अन्वये प्राप्त शासन मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२०११०४१५५९२८११२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9c66c37cf4df25ecf07a096af23d69cb2e83d31183e8f9d61db36e6ca846c9e, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2020.11.04 16:02:21 +05'30'

**(किशोर भालेराव)**
**उप सचिव (विधि), गृह विभाग**

**प्रत,**

१) पोलीस आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) सह पोलीस आयुक्त (गुन्हे), मुंबई.
३) पोलीस उपायुक्त(परिमंडळ-९), मुंबई
४) वरिष्ठ पोलीस निरीक्षक, जुहू पोलीस ठाणे, मुंबई
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र-१, मुंबई.
६) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
८) विधि व न्याय विभाग(का-१४), मंत्रालय, मुंबई.
९) वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
९) ॲड.श्री.वैभव बगाडे, बी-३०५, समजदीप को-ऑ.हौ.सो., अदुकीया रोड, एस.व्ही.रोड, कांदिवली (प), मुंबई-४०० ०६७.
१०) निवड नस्ती/पोल-१०.